विहीत मुदतींनंतर संगणकीय प्रणालीद्वारे विक्रीकराची विवरणपत्रके दाखल करणा-या व्यापा-यांसाठी शास्ती माफीची प्रशासकीय सवलत.

# महाराष्ट्र शासन
## वित्त विभाग
### शासन निर्णय क्रमांक - मुवक १५०९/ प्र. १०१/ कराधान -१
### मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
### दिनांक - १८ जुलै, २००९.

**प्रस्तावना:**

महाराष्ट्र मूल्यवर्धित कर अधिनियम, २००२ खालील व्यापा-यांनी भरावयाची विवरणपत्रके संगणकीय प्रणालीद्वारे भरणे हे नियमानुसार आवश्यक करण्यात आले आहे. त्यानुसार व्यापा-यांकडून संगणक प्रणालीद्वारे विवरणपत्रके दाखल करण्यात येत आहेत. या प्रणालीला व्यापा-यांकडून उत्तम प्रतिसाद लाभला आहे. व्यापारी व कर सल्लागारांनी संगणकीय प्रणालीद्वारे विवरणपत्रके दाखल करण्याविषयी दिलेल्या बहुमोल सहकार्याची दखल घेऊन मा. वित्तमंत्री यांनी त्यांच्या सन २००९-१० या वर्षाच्या अर्थसंकल्पिय भाषणात विहीत मुदतीनंतर विवरणपत्रके दाखल करण्याबाबत आकारण्यात येणा-या शास्ती माफी विषयी सवलत जाहीर केली आहे. त्यानुसार आकारण्यात येणारी शास्ती माफ करण्यासंबंधीची सवलत योजना जाहीर करण्याचे शासनाच्या विचाराधीन होते.

**२. शासन निर्णय:**

जे व्यापारी महाराष्ट्र मूल्यवर्धित कर अधिनियम, २००२ नुसार दाखल करावयाच्या विवरणपत्रकांपैकी दिनांक १ एप्रिल २००५ ते ३० जून २००९ या कालावधीसाठीची प्रलंबित असणारी सर्व विवरणपत्रके, दिनांक ३१ जुलै २००९ पर्यंत, कर अथवा व्याजाचे दायित्व असल्यास त्याचा भरणा करून, संगणकीय प्रणालीद्वारे विक्रीकर विभागाच्या संकेतस्थळावर दाखल करतील, अशा व्यापा-यांना विहीत मुदतीत विवरणपत्रक दाखल न केल्यामुळे लागू असणारी शास्ती माफ करण्यात येत आहे.

**३. प्रशासकीय सवलत मिळण्यास पात्र व्यापारी:**

(१) दिनांक १ एप्रिल २००५ ते ३० जून २००९ या कालावधीतील अद्याप पर्यंत दाखल न केलेली विवरणपत्रके दिनांक ३१ जुलै २००९ किंवा तत्पूर्वी, या विवरणपत्रकानुसार जर कर किंवा व्याजाचे दायित्व असल्यास तर त्याचा भरणा करून, संगणकीय प्रणालीद्वारे विक्रीकर विभागाच्या संकेतस्थळावर दाखल करणा-या व्यापा-यांनाच सदर प्रशासकीय सवलतीचा लाभ मिळू शकेल.

(२) दिनांक १ एप्रिल २००५ ते ३० जून २००९ या कालावधीमध्ये भरावयाची विवरणपत्रके विहीत मुदतीत न भरल्यामुळे दिनांक ३१ जुलै २००९ रोजी किंवा त्यापूर्वी पारित करण्यात आलेल्या शास्ती आदेशानुसार देय असणा-या शास्ती माफ करण्यात येईल.

**४. प्रशासकीय सवलत मंजूर करण्यासाठीच्या अटी:**

(१) या प्रशासकीय सवलतीचा लाभ घेण्यासाठी व्यापा-याने अशा प्रकारच्या शास्ती आदेशाविरुध्द प्रलंबित असलेले अपील, रिट याचिका विनाअट मागे घेतले पाहिजे.

(२) जर व्यापा-याने शास्ती आदेशातील नमूद शास्तीच्या रक्कमेपैकी काही रकमेचा अंशत: भरणा अपिलामध्ये केला असल्यास अशा भरलेल्या रकमेचा परतावा मिळणार नाही. परंतु व्यापा-याने अशा प्रकरणातील अपिल मागे घेतल्यास उर्वरित देय शास्ती माफीस पात्र ठरेल.

(३) ज्या व्यापा-यांनी अंशत: किंवा पूर्णत: शास्तीचा भरणा केलेला असेल त्यांना सदर भरलेल्या शास्तीचा परतावा मिळणार नाही.

**५. प्रशासकीय सवलत मंजूर करणारी यंत्रणा:**

या शासन निर्णयानुसार प्रशासकीय सवलत मंजूर करण्याविषयीचे सर्व अधिकार विक्रीकर आयुक्त, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांना देण्यात येत आहेत. हे अधिकार विक्रीकर आयुक्त त्यांच्या दुय्यम अधिका-यांना प्रदान करु शकतील. या योजनेच्या अंमलबजावणीविषयी कोणतीही अडचण उद्भवल्यास योजनेच्या तरतूदींच्या आधारे निराकरण करण्याचे अंतिम अधिकार विक्रीकर आयुक्तांना देण्यात येत आहेत व त्याबाबत त्यांचा निर्णय अंतिम असेल.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या वेबसाईटवर प्रसिध्द करण्यात आला असून त्याचा संगणक सांकेतांक २००९०७१८१८३९१५००१ असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

**ज्ञा. म. थोरात**
शासानाचे अवर सचिव

प्रत- माहितीसाठी

१) राज्यपालांचे सचिव,
२) मुख्यमंत्र्यांचे प्रधान सचिव
३) उप मुख्यमंत्र्यांचे सचिव

४) सर्व मंत्री आणि राज्यमंत्री यांचे स्वीय सचिव.
५) विक्रीकर आयुक्त, महाराष्ट्र राज्य, विक्रीकर भवन, ८ वा मजला, माझगांव, मुंबई - ४०० ०१०.(१० प्रती)
६) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)- १, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
७) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)- २, महाराष्ट्र राज्य, नागपूर.
८) महालेखापाल (लेखा परीक्षा)- १, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
९) महालेखापाल (लेखा परीक्षा)- २, महाराष्ट्र राज्य, नागपूर.
१०) संचालक, लेखा व कोषागारे, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
११) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
१२) निवासी लेखा परीक्षक, मुंबई.
१३) महासंचालक, माहिती व जनसंपर्क संचालनालय, मुंबई.
१४) निवड नस्ती, कराधान - १.